**इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या अनुसूचित जातीच्या मुलींना सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडाव विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक -इबीसी-२००३/प्र.क्र.११६/मावक -२,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २३ मे, २००३**

**प्रस्तावना -** मागासवर्गीय मुर्लींचे प्राथमिक शाळेतील गळतीचे प्रमाण कमी व्हावे यासाठी इयत्ता ५ वी ते ७ वी मधील मुलींना शिष्यवृत्ती देण्याची योजना शासन निर्णय दिनांक १२ जानेवारी १९९६ अन्वये सन १९९५-९६ पासून सुरु करण्यात आली. ही बाब लक्षात घेवून इयत्ता ८ वी ते १० वी मधील मुलींचे गळतीचे प्रमाण कमी करण्यासाठी याच धर्तीवर या योजनेचा विस्तार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -** याबाबत विचार करुन इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिक्षण घेणा-या अनुसूचित जातीच्या मुलींसाठी परिशिष्ट - "अ" मध्ये नमूद केलेल्या शिष्यवृत्ती योजनेच्या नियमाप्रमाणे सन २००३-०४ या शैक्षणिक वर्षापासून " **सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना** " या योजनेस शासन पुढीलप्रमाणे मान्यता देत आहे.

**इयत्ता ८ वी ते १० वी - दरमहा रु १००/- दहा महिने (जून ते मार्च)**

२. या बाबीवर होणारा खर्च "मागणी क्रमांक एन-४, २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण ०१- अनुसूचित जातीचे कल्याण - २७७ शिक्षण, पंचवार्षिक योजनातर्गत योजना, (०८) (०२) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८७ अन्वये जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (२२२५-०५४-८) (विघयो) ४१ सहाय्यक अनुदाने (अर्थोपाय अग्रीमाशी समायोज्य) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून प्रतिवर्षी करण्यात येणा-या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सन २००३-०४ या वर्षाकरिता येणारा खर्च वरील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक प्र.क्र.४१६/०३, व्यय-१४, दिनांक ३० एप्रिल २००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

**( नं. मा. शिलवंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति
मा. राज्यपालांचे सचिव,

मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
सचिव, (ग्रामविकास) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबइ
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना सुचित करण्यांत येते की, सदरहू योजना कार्यक्षम पध्दतीने राबविण्याबाबत तसेच योजनेची माहिती भिंतीवर रंगवून घेण्याबाबत संबंधित शाळांच्या मुख्याध्यापकांना आपल्या स्तरावरुन सुचना देण्यांत याव्यात.

संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, शिक्षण, म.रा,पुणे
वित्त विभाग, (कार्यासन व्यय १४) मंत्रालय, मुंबई ३२
उपसंचालक, शिक्षण (प्राथमिक/माध्यमिक) सर्व.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
सर्व समाज कल्याण अधिकारी, गट - अ, जिल्हा परिषद

त्यांना कळविण्यात येते की, सदर शासन निर्णयाची प्रत सर्व ग्रामपंचायती, नगरपालिका, महानगरपालिका यांना व सर्व शासन मान्य शाळांना त्यांनी त्यांच्या स्तरावरुन निर्गमित करावी.

सर्व शिक्षणाधिकारी ( प्राथमिक / माध्यमिक )

त्यांना कळविण्यात येते की, सदर शासन निर्णयाची प्रत सर्व शासन मान्य शाळांना त्यांनी त्यांच्या स्तरावरुन निर्गमित करावी.

महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ ( लेखा परीक्षा, लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
सर्व कोषागार अधिकारी, मुंबइ
निवड नस्ती , मावक - २

# परिशिष्ट -अ

## शासन निर्णय क्रमांक.इबीसी.२००३/प्र.क्र.११६/मावक २, दिनांक २३ मे , २००३ चे सहपत्र

## सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजनेची नियमावली

१ ही शिष्यवृत्ती योजना शासन मान्यताप्राप्त शासकीय / जिल्हा परिषदा / नगरपालिका / महानगरपालिका / अनुदानित / विनाअनुदानित / प्राथमिक / माध्यमिक मान्यताप्राप्त शाळातील इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या अनुसूचित जातीच्या मुलींसाठी आहे.

२ ही योजना सन २००३-०४ या शैक्षणिक वर्षापासून अंमलात येईल

३ ही योजना गुणवत्ता शिष्यवृत्ती व्यतिरिक्त राहील.

४ या शिष्यवृत्तीसाठी मागासवर्गीय मुलींना उत्पन्नाची अट राहणार नाही.

५ या शिष्यवृत्तीसाठी गुणांची अट राहणार नाही फक्त विद्यार्थिनींची उपस्थिती नियमित असणे आवश्यक राहील. शाळेमधील जेवढी उपस्थिती असेल त्यानुसार शिष्यवृत्ती देण्यात येईल.

६ ही शिष्यवृत्ती इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या अनुसूचित जातीच्या मुलींना खालीलप्रमाणे दहा महिन्यांसाठी मंजूर करण्यात येईल

**इयत्ता ८ वी ते १० वी रु.१००/- दरमहा दहा महिने ,जून ते मार्च**

७ ही शिष्यवृत्ती दरवर्षी शैक्षणिक वर्षाच्या कालमर्यादेपुर्तीच म्हणजेच दहा महिन्यांसाठी मंजूर करण्यात येईल.

८ शिष्यवृत्ती वाटप केल्याचे विनियोग दाखले हे पुढील वर्षाचे प्रस्ताव सादर करताना देणे आवश्यक राहील.

९ ही शिष्यवृत्ती मिळविण्यासाठी मागासवर्गीय मुलींना अर्ज करण्याची आवश्यकता नसेल

१० ही शिष्यवृत्ती मंजूर करण्यासाठी सर्व मान्यताप्राप्त शाळांमधून मागासवर्गीय मुलींची माहिती खालीलप्रमाणे मागविण्यात येईल.

| **अ.क्र.** | **विद्यार्थिनीचे नाव** | **जात व पोटजात (शाळेच्या अभिलेख्यानुसार)** | **इयत्ता** | **मागील वर्षी उत्तीर्ण झाले किंवा कसे** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |

११ (अ) उपरोक्त माहिती ही मुख्याध्यापकांच्या सही व शिक्क्यानिशी माहे १० जुलै पर्यंत मागविणे समाज कल्याण अधिकारी, गट -अ, जिल्हा परिषद यांच्यावर बंधनकारक राहील.

(ब) ही शिष्यवृत्ती वर्षातून तीनदा म्हणजे जुन व जुलै या महिन्याकरीता दिनांक २६ जुलै रोजी , ऑगस्ट व सप्टेंबर या महिन्याकरीता दिनांक २२ सप्टेंबर रोजी व ऑक्टोबर ते उर्वरित कालावधीसाठी ३ जानेवारी या ठराविक दिवशीच सर्व राज्यात सर्व अनुसूचित जातीच्या मुलींना देण्यात यावी

(क) मंजूर करण्यांत आलेली शिष्यवृत्ती दिनांक २६ जुलै, २२ सप्टेंबर व ३ जानेवारी या दिवशी मुलींना संबंधित ग्रामपंचायतीकडून समारंभपूर्वक प्रमुख पाहुण्यांच्या हस्ते वितरीत करण्यांत यावी.

(ड) एखादया शाळेचा प्रस्ताव राहिल्यास अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी व समाज कल्याण अधिकारी, गट -अ, जिल्हा परिषद / समाजकल्याण अधिकारी वर्ग-२, बृहन्मुंबई यांना जबाबदार धरण्यात येवून त्यांच्यावर कार्यवाही प्रस्तावित करण्यात येईल

१२ (अ) सदरहू योजनेच्या विस्तृत प्रसिध्दीसाठी

१. शाळा, ४.पंचायत समिती

२. ग्रामपंचायत, ५.तहसिल कार्यालय

३.दलितवस्ती (समाज मंदिर), ६.जिल्हा परिषद

यांच्या इमारतीच्या दर्शनी भागाच्या भिंतीवर योजनेची माहिती रंगवून घेण्यात यावी.

उपरोक्त ६ ठिकाणी एका इमारतीच्या दर्शनी भागाच्या इमारतीवर योजने बाबतची माहिती रंगवून घेण्यासाठी प्रत्येक ग्राम पंचायत असलेल्या गांवात रु.५००/- प्रमाणे योजनेच्या पहिल्या वर्षात खर्च करण्यांत येईल.(रु.५००/- प्रमाणे ३ ठिकाणी योजनेची माहिती रंगवून घेण्यासाठी शासन मंजूरी देत आहे. अन्य ठिकाणी समाज कल्याण अधिकारी गट-अ,जिल्हा परिषद यांनी योजनेची माहिती रंगवून घेण्याची कार्यवाही करावी.)

सन २००३-२००४ मध्ये ग्रामीण भागातील सर्व शाळा व गांवात हे काम पूर्ण करण्यांत यावे. व सन २००४-२००५ मध्ये शहरी व उर्वरित ठिकाणी योजनेची माहिती रंगवून घेण्याचे काम पूर्ण करण्यांत यावे. याबाबतचा खर्च या योजनेच्या सन २००३-२००४ व सन २००४-२००५ च्या आर्थिक तरतूदीतून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. ही रक्कम संबंधीत शाळेला थेट देण्यात येईल.

(ब) ही योजना राज्यात तळागाळा पर्यत पोहोचावी आणि योजनेबद्दल सर्वांगिण जाणीव जागृती व्हावी यासाठी प्रत्येक जिल्हयात या योजनेच्या प्रसिध्दीसाठी रु.१.०० लाख पर्यंत खर्च करण्यात यावा. मात्र राज्यस्तरीय प्रसिध्दीसाठी एकत्रित योजना माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाशी विचारविनिमय करुन राबविण्याचे अधिकार संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत.

१३ या शिष्यवृत्ती योजनेत अपहार झाल्याचे सिध्द झाल्यास संबंधित शाळेच्या मुख्याध्यापकावर फौजदारी कारवाई करण्यांत येईल.

१४ सदरची शिष्यवृत्ती समाजकल्याण अधिकारी गट-अ, जिल्हा परिषद / समाजकल्याण अधिकारी गर्ट-ब, बृहन्मुंबई हे मंजूर करतील